प्रशासकीय मान्यता-
म्हसवड, तालुका-माण, जि.सातारा येथे
न्यायालयीन इमारत बांधण्याबाबत..

महाराष्ट्र शासन
विधी व न्याय विभाग,
शासन निर्णय क्र. सीसीबी ३१०५/११६१/(प्र.क्र.१०५)-का.तेरा.
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दि. ८ ऑक्टोबर, २००७.

पहा :- १) अपर प्रबंधक, उच्च न्यायालय (निरीक्षणे), मुंबई यांचे पत्र क्र.बी(डब्ल्यू)/६०५३/१९९९, दि.१ ऑक्टोबर, २००५.
२) जिल्हा व सत्र न्यायाधीश. सातारा यांचे पत्र क्र.४५३९, दिनांक ६ ऑगस्ट, २००५.

**शासन निर्णय** :-म्हसवड, तालुका-माण, जि.सातारा येथे न्यायालयीन इमारत बांधावयाच्या रु.१,२०,१२,३००/- (एक कोटी वीस लक्ष बारा हजार तिनशे फक्त) इतक्या अंदाजित खर्चास (खाली नमुद केलेल्या विगतवारीनुसार) याद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

(रुपये)

| | | |
|---|---|---|
| १ | इमारतीचा बांधकाम खर्च | ५१,६१,१०२ |
| २ | अंतर्गत रस्ते | ५,५९,६२९ |
| ३ | आवार भिंत व गेट | ८,७४,५३३ |
| ४ | जमीन सपाटीकरण | ६,२३,००९ |
| ५ | रस्त्यावरील लाईट | ८३,१२५ |
| ६ | सायकल स्टॅन्ड व मोटार शेड | १,७२,५८१ |
| ७ | ४ %आकस्मिक खर्च | २,९८,९५९ |
| ८ | रेन वॉटर हारवेस्टिंग | १,००,००० |
| ९ | १५% सन २००५-०६ ते २००६-०७ दरसूचीवरील वाढ | ११,२१,०९६ |
| १० | १० %किंमतीत झालेली वाढ | ७,४७,३९३ |
| ११ | विद्युतीकरण | ५,६७,७२१ |
| १२ | पाणी पुरवठा व मलनि:स्सारण | ४,१२,८८८ |
| १३ | १५% कार्यालयाकरिता फर्नीचर्स | ७,७४,१६५ |
| १४ | १० % गार्डनिंग | ५,१६,११० |
| | एकूण | १,२०,१२,३११<br>म्हणजेच रु.१,२०,१२,३०० |

२. ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

" प्रस्तुत इमारतीचे काम वास्तुशास्त्रज्ञ यांच्याकडून मांडणी नकाशा तयार करुन घेतल्यावरच सुरु करावे ".

E:\s oldda\DESK-13\Desk 13\Satara-Mahaswad

३. या प्रीत्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र.एच-८, ४०५९-सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च-०१ कार्यालयीन इमारती-१०१ बांधकाम-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-प्रमुख बांधकामे-०३ न्यायदान" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. मात्र, अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.

४. हे आदेश, सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक:- १४८/इमा-२, दि.२ जून, २००७, अनुसार त्या विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभाग शासन निर्णय क्र. क्रमांक:-विअप्र १०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम, दि.११ जुलै २००१ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( र. ग. पांचाळ )
कार्यासन अधिकारी.
विधी व न्याय विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

मा.राज्यपाल यांचे सचिव, महाराष्ट्र राज्य, राजभवन, मुंबई,
महाप्रबंधक, उच्च न्यायालय , मुंबई,
प्रबंधक (निरीक्षण), उच्च न्यायालय (अपिल शाखा) , मुंबई,
प्रधान जिल्हा व सत्र न्यायाधीश, सातारा,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखापरीक्षा) - एक, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा) , महाराष्ट्र-दोन, नागपूर,
अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, जि.सातारा,
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सातारा, (अंदाजपत्रक व आराखडे यांसह)
उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ , दहीवाडी, जि.सातारा,
जिल्हा कोषागार अधिकारी ,जि.सातारा
उप कोषागार अधिकारी, दहीवाडी जि.सातारा,
सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
अपर आयुक्त व सदस्य सचिव,उर्वरित विदर्भ वैधानिक विकास मंडळ,. बी.२३/१, साऊथ अंबाझरी रोड, (अंध विद्यालया जवळ) नागपूर ४४००२२
महासंचालक , माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
निवड नस्ती.